महत्वाच्या प्रकल्पाबाबत सल्लागारांच्या नेमणूका व देय शुल्काबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण २०१८/प्र.क्र.६२/इमा-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०९/१०/२०१८

वाचा- सा.बां.विभाग शासन निर्णय क्रमांक खाक्षेस-२०१५/प्र.क्र.२०९/रस्ते-९अ, दि.२४/१/२०१७

**प्रस्तावना-**

संदर्भान्वये सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत हाती घ्यावयाच्या प्रकल्पाकरीता सल्लागार नेमण्याबाबत सविस्तर शासन निर्णय निर्गमित करण्यात आलेला आहे. शासनाच्या विविध खात्यामार्फत प्रादेशिक पर्यटन, तिर्थक्षेत्र विकास, मुलभूत सुविधा व इतर अनेक योजनेअंतर्गत मा.लोकप्रतिनिधींकडून कामे प्रस्तावित करण्यात येतात व अशा कामांचे प्रस्ताव खाजगी सल्लागारांकडून तयार करवून तांत्रिक सहमतीकरीता सादर केले जातात. सदर प्रस्तावातील काही प्रस्तावांना जिल्हाधिकारी कार्यालय किंवा शासनाकडून प्रशासकीय मान्यता व निधी प्राप्त होतो व त्यानंतर कामे करण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडे वर्ग केला जातो. सार्वजनिक बांधकाम विभागाकडे निधी प्राप्त झाल्यानंतर प्रस्ताव तयार करणा-या खाजगी प्रकल्प सल्लागाराचे शुल्क देण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागास सांगण्यात येते. परंतु खाजगी सल्लागाराची नेमणूक ही सार्वजनिक बांधकाम विभागाने केलेली नसते. तसेच सदरची नेमणूक संदर्भिय शासन निर्णयानुसार झालेली नसल्यामुळे सल्लागाराची फी देणे सार्वजनिक बांधकाम विभागाला शक्य होत नाही. सदर बाबतीत सार्वजनिक बांधकाम विभागाने खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

**शासन परिपत्रक-**

खाजगी वास्तुशास्त्रज्ञ/प्रकल्प सल्लागार यांच्या सेवा एखादा प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी प्रशासकीय मान्यतेपूर्वी उपभोक्ता विभागाने घेतल्या असल्यास -

१) प्रशासकीय मान्यता प्राप्त करावयाच्या अंदाजपत्रकास प्रकल्प सल्लागाराच्या फी बाबत आवश्यक अतिरिक्त तरतूद करावी.

२) उपभोक्ता विभागाने प्रशासकीय मान्यता प्रदान केली याचा अर्थ उपभोक्ता विभागाची सदर प्रकल्प आराखडयास (व्याप्ती व किंमत) सहमती आहे असा होतो.

३) प्रशासकीय मान्यता व निधी प्राप्त झाल्यानंतर संबंधीत कार्यकारी अभियंता यांनी प्रशासकीय मान्यता व्याप्तीत दर्शविलेली खाजगी सल्लागारांच्या/वास्तुशास्त्रज्ञाच्या शुल्काची रक्कम उपभोक्ता विभागास वर्ग करावी व उपभोक्ता विभागाने संबंधिताकडून (खाजगी सल्लागार/वास्तुशास्त्रज्ञ) नकाशे व अंदाजपत्रके तयार केली असल्याने सदर देय रक्कम प्रस्ताव तयार करणा-या वास्तुशास्त्रज्ञांना/सल्लागारांना त्यांच्या स्तरावरुन प्रदान करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८१००९१२१८५१९७१८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Uttarwar

Digitally signed by Sanjay Uttarwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cab21a54ad660ded981a3eca61380e321e245c3a783fe22e29d3e1080185a683, serialNumber=23844598153e02b0343bb8841e656191857a573661abb05577db911eb5e3ded7, cn=Sanjay Uttarwar
Date: 2018.10.09 12:21:16 +05'30'

**( संजय उत्तरवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२) सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
३) सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मुख्य अभियंता , सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांना आवश्यक कार्यवाहीसाठी
५) सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांना आवश्यक कार्यवाहीसाठी
६) सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांना आवश्यक कार्यवाहीसाठी
आपण आपल्या अधिपत्याखालील सर्व अभियंत्यांना सदर बाबतीत आवश्यक कार्यवाहीकरीता निर्गमित करावे.